**श्री.संजय मधुकर बेलसरे, सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग यांची महाराष्ट्र शिक्षण सेवा वर्ग-१ (कनिष्ठ) या पदावरील सेवा जलसंपदा विभागातील सहायक कार्यकारी अभियंता या पदावरील सेवेस जोडून देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग,**
**शासन आदेश क्रमांक : संकीर्ण ११२२/प्र.क्र. २०८/२०२२/आ(वर्ग-१)**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २६ जुलै, २०२४.

**वाचा :** १) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक- अंनियो १००६/८७/सेवा ४, दिनांक १२.०१.२००७.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक- सेनिवे १००८/९६/सेवा ४, दिनांक ०३.११.२००८.
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक- अंनियो १००९/प्र.क्र. ३२/सेवा ४, दिनांक १८.०८.२००९.
४) शासन निर्णय, शिक्षण व सेवायोजन विभाग, क्रमांक- एससीटी ६५९१/२९७२/(१५७/९१)/तांशि-४, दिनांक १०.०१.१९९२.
५) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण आणि सेवायोजन विभाग, क्रमांक- एससीटी ६५९१/ १६२४/ (१०२/९१)/ तांशि-४, दिनांक २८.१०.१९९२.
६) शासन निर्णय, पाटबंधारे विभाग, क्रमांक- नियुक्ती १०९३/६०/आ.(संनि), दिनांक ०७.१२.१९९३.
७)शासन निर्णय, पाटबंधारे विभाग, क्रमांक- नियुक्ती १०९३/(५९/९३)/आ(संनि), दिनांक २६.०९.११९७.

**<u>प्रस्तावना</u> :**

श्री.संजय मधुकर बेलसरे, सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग यांची महाराष्ट्र शिक्षण सेवा वर्ग-१ (कनिष्ठ) या सेवेतील शासकीय तंत्रनिकेतन, कोल्हापूर येथील अधिव्याख्याता (स्थापत्य अभियांत्रिकी ) आणि शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, अमरावती येथील अधिव्याख्याता (स्थापत्य अभियांत्रिकी) पदावरील सेवा जलसंपदा विभागातील सहायक कार्यकारी अभियंता या पदावरील सेवेस जोडून त्याचा लाभ सेवानिवृत्ती वेतनासाठी मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन आदेश</u> :**

उपरोक्त संदर्भाधीन क्र. ४ येथील शिक्षण व सेवायोजन विभागाच्या दिनांक १०.०१.१९९२ च्या शासन निर्णयान्वये श्री.संजय मधुकर बेलसरे यांची शासकीय तंत्रनिकेतन, कोल्हापूर येथे अधिव्याख्याता, स्थापत्य अभियांत्रिकी या पदावर प्रथम नियुक्ती झाली होती. त्यानुषंगाने ते सदर पदावर दिनांक १३.०४.१९९२ रोजी रुजू झाले. त्यानंतर उच्च व तंत्रशिक्षण आणि सेवायोजन विभागाच्या संदर्भाधीन क्र. ५ येथील दिनांक २८.१०.१९९२ च्या शासन निर्णयान्वये त्यांची नियुक्ती महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, अमरावती येथील अधिव्याख्याता स्थापत्य अभियांत्रिकी या पदावर झाली. श्री.बेलसरे हे शासकीय तंत्रनिकेतन, कोल्हापूर या पदावरुन दिनांक १८.११.१९९२ रोजी कार्यमुक्त होवून शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, अमरावती येथील पदावर दिनांक १९.११.१९९२ रोजी रुजू झाले.

२. जलसंपदा विभागाच्या संदर्भाधीन क्र. ६ येथील दिनांक ०७.१२.१९९३ च्या शासन निर्णयान्वये श्री.बेलसरे यांची नियुक्ती सहायक कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या पदावर करण्यात आली. त्यानुसार श्री.बेलसरे दिनांक ०२.०१.१९९४ रोजी अधिव्याख्याता स्थापत्य अभियांत्रिकी, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, अमरावती या पदावरुन कार्यमुक्त होऊन जलसंपदा विभागातील सहायक कार्यकारी अभियंता पदावर दिनांक ०३.०१.१९९४ रोजी रुजू झाले. त्यांनी सदर पदावरील २ वर्षांचा परिविक्षाधीन कालावधी

दिनांक ०९.०४.१९९६ रोजी समाधानकारकरित्या पूर्ण केल्याबाबतचे आदेश संदर्भाधीन क्रमांक- ७ येथील दिनांक २६.०९.१९९७ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आले.

३. श्री.बेलसरे यांनी शासकीय तंत्रनिकेतन, कोल्हापूर येथील अधिव्याख्याता स्थापत्य अभियांत्रिकी पदावरील प्रथम नियुक्तीपूर्वीच महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत घेण्यात आलेल्या सन १९९१ च्या मागणीपत्रानुसार महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा वर्ग-१ च्या परीक्षेस बसण्यासाठी अर्ज केला होता. त्यांच्या तीनही सेवांमध्ये कोणताही सेवा खंड पडलेला नाही. तसेच ते प्रथम शिक्षण व सेवायोजन विभागांतर्गत राज्य शासनाच्या सेवेत असल्यामुळे ते सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजनेचे सभासद आहेत.

४. श्री.संजय मधुकर बेलसरे हे, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ मधील नियम ३३ तसेच वित्त विभागाच्या परिपत्रक, दिनांक १२.०१.२००७, दिनांक ०३.११.२००८ व दिनांक १८.०८.२००९ मधील अटींची पूर्तता करत असल्याने, शिक्षण व सेवायोजन विभागांतर्गत शासकीय तंत्रनिकेतन, कोल्हापूर येथील अधिव्याख्याता स्थापत्य अभियांत्रिकी या पदावरील दिनांक १३.०४.१९९२ ते १८.११.१९९२ या कालावधीतील, तसेच उच्च व तंत्रशिक्षण आणि सेवायोजन विभागांतर्गत शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, अमरावती येथील अधिव्याख्याता स्थापत्य अभियांत्रिकी पदावरील दिनांक १९.११.१९९२ ते ०२.०१.१९९४ या कालावधीतील पूर्वीची सेवा, सध्याच्या जलसंपदा विभागातील सहायक कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या पदावरील दिनांक ०३.०१.१९९४ पासूनच्या सेवेस फक्त निवृत्तीवेतनविषयक लाभांकरीता जोडून देण्यास, या शासन आदेशान्वये मान्यता देण्यात येत आहे.

५. सदर शासन आदेश, वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्रमांक- १२२/२०२४/सेवा ७, दिनांक १६.०४.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या शासन संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात येत असून त्याचा सांकेतांक क्रमांक- २०२४०७२६१८११४४५४२७ असा आहे. तसेच सदर आदेश जलसंपदा विभागाच्या www.wrd.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

UDDHAV RABHAJI DAHIPHALE

Digitally signed by UDDHAV RABHAJI DAHIPHALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=05b3ca49b9a0a924fd4d8743e6e254e742308f02108527986e098afc27201f30, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=2D80774C9ED65ECA9BE69006934BFB5C4CA32AB0DC1A2EC5746398458BDF1C37, cn=UDDHAV RABHAJI DAHIPHALE
Date: 2024.07.26 18:26:06 +05'30'

**( उ. र. दहिफळे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) सचिव (ला.क्षे.वि.)/ सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) डॉ.संजय मधुकर बेलसरे, सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) महालेखापाल- १ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), मुंबई.
७) महालेखापाल- २ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), नागपूर.
८) कक्ष अधिकारी (आ/संनि)/ आ(वर्ग-२)/ गोपनीय/ दक्षता/ रोखशाखा/ आ(क्षेप्र)), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई.
१०) आ (वर्ग-२) कार्यासन संग्रहार्थ.